**महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्यादित. सतत व समवर्ती लेखापरिक्षण योजना राबविण्यासाठी निर्माण केलेली २ अस्थायी पदे दि ०१/१०/२०१६ ते २८/२/२०१७ पर्यत चालु ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मरास ०२१६/प्र.क्र.८०/२-स,**
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २८ ऑक्टोबर, २०१६.

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दिनांक ०५/०५/२०११.
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालय यांचे पत्र जा.क्र. आस्थापना/कक्ष-१/मरासबँक/मुदतवाढ/१०९४/२०१६, दि. १०/८/२०१६.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र मुदत ०५१५/प्र.क्र.१६३/२-स, दिनांक ८/१०/२०१५.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१ दि. २१/९/२०१६
५) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र. मुदत ०२१६/प्र.क्र.८०/२-स, दिनांक २/४/२०१६.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र १ अन्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी/ अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सहकार विभागाचा सुधारीत आकृतीबंध शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. राजस/१००८/ प्र.क्र. ५३८/ ५-स, दि. ५ मे २०११ अन्वये निश्चित करण्यात आला असून सदर आकृतीबंधामध्ये प्रस्तुत २१ पदांचा समावेश आहे. उपरोक्त वाचा क्र ५ अन्वये महाराष्ट्र राज्य सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या २१ पैकी ०२ अस्थायी पदांना दि. ३०/९/२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाने मंजूरी दिलेली होती. सदरची मुदत वाढ संपुष्टात येत असल्याने त्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षण योजना राबविणेबाबत लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली २१ पैकी ०२ अस्थायी पदे सन २०१६-१७ कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याबाबत ९७ व्या घटनादुरुस्तीच्या अनुषंगाने लेखापरीक्षण विभागास आवश्यकतेनुसार काम करण्यासाठी वर नमूद वाचा क्र. २ च्या पत्रान्वये सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयामार्फत प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने सदर २ अस्थायी पदांना सन २०१६-१७ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था. महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या उपरोक्त वाचा क्र. २ मधील अ,ब,क प्रस्तावानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेली खालील०२ अस्थायी पदे कार्यरत आहेत. या पदांना

**दि. ०१/१०/२०१६ पासून दि. २८/२/२०१७ पर्यंत या शासन निर्णयाव्दारे मुदतवाढीस मान्यता देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरीक्षक, वर्ग-१ | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० | १ |
| २ | लेखापरीक्षक श्रेणी-१ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | १ |
| **एकूण पदे** | | | **२** |

या प्रित्यर्थ होणारा खर्च हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्र. व्ही-२ मधील अर्थसंकल्पीय लेखाशिर्ष "२४२५-सहकार-(००) १०१-सहकारी संस्थांची लेखा परिक्षा-(०१)(ए) लेखापरिक्षेसाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दि. २१/९/२०१६ अन्वये संबंधित प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या मुदतवाढीच्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२८१५५५०२३६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2016.10.28 15:58:11 +05'30'

**( दिपक म. राणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई (३ प्रती)
३) महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, नागपूर (३ प्रती)
४) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) , महाराष्ट्र राज्य , पुणे
९) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य सहकारी बँक , मुंबई.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहाकरी बँक मर्या. मुंबई.
११) वित्त विभाग (व्यय-२) /(वित्तीय सुधारणा-१) /अर्थसंकल्प-१९ /व्यय-१४/अर्थसंकल्प-१२, मंत्रालय, मुंबई

१२) कार्यासन अधिकारी ५-स,/१२-स,/१७-स, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, मुंबई विभाग, मुंबई

१४) विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या.,

१५) विभागीय कार्यालय,नागपुर.

१६) निवड नस्ती.